नवनिर्मित पालघर जिल्ह्यातील निवडणूक कार्यालयासाठी पाच अस्थायी पदे निर्माण करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०१४/प्र.क्र.९८८/१४/३३**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०००३२.

दिनांक : १४ ऑगस्ट, २०१४

**वाचा —**

१) सा.प्र.वि., शासन निर्णय क्रमांकः पीएसटी-१०००/प्र.क्र.१४/३३, दिनांक ७ फेब्रुवारी, २००५.

२) शासन अधिसूचना क्रमांक प्राफेब-११०८/प्र.क्र.१६७/ठाणे/म-१०, दिनांक १७ जून, २०१४.

३) जिल्हाधिकारी, ठाणे यांचे पत्र क्रमांकः सामान्य/कक्ष-१/टे-३/आस्था/निवडणूक, दिनांक १८/०७/२०१४.

**प्रस्तावना —**

महसूल व वन विभाग, अधिसूचना क्रमांक प्राफेब-११०८/प्र.क्र.१६७/ठाणे/म-१०, दिनांक १७ जून, २०१४ नुसार ठाणे जिल्ह्याचे विभाजन करुन दिनांक ०१/०८/२०१४ पासून पालघर, वसई, डहाणु, तलासरी, जव्हार, वाडा, मोखाडा आणि विक्रमगड या तालुक्यांचा समावेश असलेला पालघर जिल्हा निर्माण केला असुन त्याचे मुख्यालय पालघर येथे ठेवण्यात आले आहे. नवनिर्मित पालघर जिल्ह्यातील निवडणूक कार्यालयासाठी पदनिर्मिती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय—**

भारत निवडणूक आयोगाच्या अखत्यारितील राज्यातील निवडणूकांच्या संदर्भातील कामांकरीता राज्य, जिल्हा व तहसिल स्तरावर आवश्यक असलेल्या पदांच्या आकृतीबंधास राज्य शासनाने मान्यता दिलेली आहे. सदर आकृतीबंधाप्रमाणे जिल्हा स्तरावर प्रत्येक जिल्ह्याकरिता एक उप जिल्हा निवडणूक

अधिकारी, एक नायब तहसिलदार, एक अव्वल कारकून, एक लिपिक-टंकलेखक व एक शिपाई ही पदे निश्चित करण्यात आली आहेत. त्यानुसार मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली दिनांक ७ ऑगस्ट, २०१४ रोजी दुपारी ३.३० वाजता आयोजित केलेल्या उच्चस्तरीय समितीच्या बैठकीमध्ये पालघर जिल्ह्याच्या निवडणूक कार्यालयासाठी ५ पदांच्या निर्मितीस मान्यता दिली आहे. त्यानुसार नवनिर्मित पालघर जिल्ह्याच्या निवडणूक कार्यालयासाठी खाली नमूद केलेली ५ अस्थायी पदे नव्याने निर्माण करण्यास या शासन निर्णयान्वये खालील शर्ती-अटीनुसार मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | **पदनाम** | **वेतनश्रेणी रुपये** | **पदांची संख्या** |
|---|---|---|---|
| १. | उप जिल्हाधिकारी | १५६००-३९१००(ग्रेड पे ५४००) | १ |
| २. | नायब तहसिलदार | ९३००-३४८०० (ग्रेड पे ४३००) | १ |
| ३. | अव्वल कारकून | ५२००-२०२००(ग्रेड पे २८००) | १ |
| ४. | लिपिक **#** | ५२००-२०२००(ग्रेड पे १९००) | १ |
| ५. | चतुर्थश्रेणी कर्मचारी * | ४४००-७४००(ग्रेड पे १३००) | १ |
| | | एकुण | ५ |

# या पदांना मराठी व इंग्रजी या दोन्ही भाषेतील टंकलेखन/ श्रुतलेखनाचे व संगणकाचे ज्ञान असणे आवश्यक राहील. या पदांची कामे प्रचलित नियमानुसार बाह्ययंत्रणेकडून करुन घेण्यात यावीत.

* चतुर्थश्रेणी कर्मचारी जसे शिपाई, पहारेकरी, नाईक, सफाईगार इत्यादी असा वेगवेगळा संवर्ग न ठेवता एकच संवर्ग चतुर्थश्रेणी कर्मचारी असे पद निर्माण करावे आणि त्यांच्या कामाचे स्वरुप व जबाबदारी multitasling स्वरुपाच्या असतील याची दक्षता घ्यावी. तसेच सदर पदांची कामे बाह्ययंत्रणेकडून करुन

घेताना जॉब चार्ट निश्चित करुन, निकष ठरवून कामे देण्यात यावी. बाह्यस्त्रोताद्वारे (outsourcing) कामे करुन घेताना multitasling करण्याची क्षमता असणारा मनुष्यबळ मिळविण्याचा प्रयत्न करण्यात यावा जेणेकरुन कमी मनुष्यबळाकडून जास्त काम करुन घेणे शक्य होईल.

याबाबतचा खर्च प्रधानशीर्ष २०१५ -निवडणूका उपशीर्ष १०२- निवडणूक अधिकारी, (००)(०१) निवडणूक अधिकारी, मागणी क्रमांक ए-२ संगणक संकेतांक (२०१५००१२) या लेखाशीर्षाखाली खर्ची घालण्यात यावा.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ७५०/१४/व्यय-४,दिनांक ७ ऑगस्ट, २०१४ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८१४१५४९१६८५०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

LUDBE ATMARAM M

Digitally signed by LUDBE ATMARAM M
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=GAD, postalCode=400032, st=Maharashtra, cn=LUDBE ATMARAM M
Date: 2014.08.14 15:51:32 +05'30'

**(आ. म. लुडबे)**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई.

२. सर्व विभागीय आयुक्त.

३. सर्व जिल्हाधिकारी.

४. प्रधान महालेखापाल व महाराष्ट्र -१/२, (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई-२०.

५. प्रधान महालेखापाल व महाराष्ट्र -१/२, (लेखा परीक्षा), नागपूर.

६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

७. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.

८. जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे/पालघर.

९. कक्ष अधिकारी, व्यय-४/वित्तीय सुधारणा -१, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

१०. निवडनस्ती कार्यासन-३३.